पदस्थापना उप अभियंता (स्थापत्य)

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन आदेश क्रमांकः संकीर्ण २०२४/प्र.क्र.१५१ /सेवा-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक: १६.०७.२०२४

वाचा - शासन आदेश, सा.बां.विभाग, क्र.एस-९२/११२३/प्र.क्र.५५/सेवा-६(ड), दि.१६.०७.२०२४

## शासन आदेश

संदर्भाधीन शासन आदेशान्वये श्री. संजय विक्रम दहिफळे, उप विभागीय अधिकारी यांचे निलंबन संपुष्टात आणून त्यांना त्यांच्याविरूध्दच्या फौजदारी प्रकरणामध्ये मा. न्यायालयाच्या अंतिम न्याय निर्णयाच्या व विभागीय चौकशीच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहून शासन सेवेत पुनःस्थापित करण्यात आले आहे. प्रस्तुत शासन आदेशान्वये श्री. संजय विक्रम दहिफळे, उप विभागीय अधिकारी यांची पदस्थापना **उप कार्यकारी अभियंता, इमारती बांधकाम विभाग, मुलूंड, मुंबई** या रिक्त पदावर करण्यात येत आहे.

२. श्री. संजय विक्रम दहिफळे, उप विभागीय अधिकारी यांच्या पदस्थापनेबाबतचे सदरहू आदेश, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन व शासकीय कर्तव्य पार पाडताना होण्याऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील तरतुदीनुसार व सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

३. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. संजय विक्रम दहिफळे, उप विभागीय अधिकारी यांना नवीन नेमणूकीच्या ठिकाणी तात्काळ रुजू करून घ्यावे.

४. श्री. संजय विक्रम दहिफळे, उप विभागीय अधिकारी यांनी नवीन पदाचा कार्यभार त्वरीत स्वीकारावा. श्री. दहिफळे यांनी म.ना.से. (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार दिलेल्या पदग्रहण अवधीतच, पदस्थापनेच्या पदावर रुजू होणे आवश्यक राहील. अन्यथा त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९, मधील नियम २३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यानी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

५. संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्री. दहिफळे, उप विभागीय अधिकारी यांचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत शासनास कळवावा. विहित कालावधीत संबंधीत अधिकारी रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरीत अवगत करण्यात यावे, जेणेकरून संबंधीतांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई त्वरीत करणे शक्य होईल.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२४०७१६१६०७१७१११८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DATTATRAY VASANTRAO KHARKE

Digitally signed by DATTATRAY VASANTRAO KHARKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=d598800beb5ed37ae09d78fff05921827123426ec3977a7476478ce183be979d, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=6BAEF55AD6F77A3A40CCCC3E9DD0F50E344AB83A754542299875CF07868ED88B, cn=DATTATRAY VASANTRAO KHARKE
Date: 2024.07.16 16:19:18 +05'30'

**( द .व. खारके )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १-मुंबई / २-नागपूर.
२. खाजगी सचिव, मा. मंत्री (सा.बां.), मंत्रालय, मुंबई.
३. अ.मु.स.(सा.बां.वि.)/सचिव(रस्ते)/सचिव(बांधकामे) यांचे स्वीय सहायक, सा.बां.वि.मंत्रालय, मुंबई.
४. मुख्य अभियंता, सा.बां.प्रा.विभाग, मुंबई/कोकण
५. संबंधीत अधीक्षक अभियंता, सा.बां.मंडळ.
६. संबंधीत कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.
७. अधिदान व लेखाधिकारी, निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई
८. संबंधीत अधिकारी (ई-मेल द्वारे).
९. कार्यासन सेवा-६(ड), सा.बां.वि., मंत्रालय, मुंबई
१०. कार्यासन सेवा-२, संग्रहार्थ